Book design by Adrienne Syphrett
The illustration in this book were done in colored pencil with watercolor washes.



Original English edition published by Scholastic Inc.

This Marathi edition published in 2016 by Scholastic India Pvt. Ltd.,
A-27, Ground Floor, Bharti Sigma Centre, Infocity-I, Sector-34, Gurgaon 122 002

Co-publisher: Kaja Kaja Maru Prakashan
Garware Balbhavan, Opposite Sarasbag, Pune 411 002
Tel. 020 24442109



₹ 100
ISBN: 978-93-86106-73-5







Thanks to Bruce McMillan for his guidance and enthusiasm; to Florence Ogah Bellini, Hanna Bulger, Steve Connors, Joan O'Brien, and Cathy Scala for refernce help and support; to the Peace Corps for the opportunity to live and work in Benin; and very special thanks to the people of Benin, especially to the residents of Sé who were such gracious neighbors for two years, and who taught me by their example the profound importance of community.

# मूल - साऱ्या गावाचं

जेन कोवेन फ्लेचर

अनुवाद शोभा भागवत



गरवारे बालभवन, पुणे

सूर्य हळू हळू वर येत होता.

पण गावातले लोक केव्हाच उठले होते.

आज बाजाराचा दिवस होता.

"येमी," आई म्हणाली, "आज बाजारात तू आपल्या कोकूला सांभाळ बरं का. आज आंबे विकायचेत. माझं लक्ष तिकडेच असेल."



“ये कोकू,” येमी म्हणाली. “आज मी तुला सांभाळणार आहे. एकटी मी!”

“तू एकटी का?” आईनी येमीकडे हसून बघत म्हटलं. तिला सगळं माहित होतं.

आईनी आंब्याची टोपली उचलली. येमीनं कोकूला उचलून पाठुंगळी घेतलं. आईबरोबर घरातून निघताना आपण आता खूप मोठ्या झालो असं येमीला वाटत होतं.



बाजाराच्या गावी जाणाऱ्या लोकांबरोबर त्या चालू लागल्या. आसपासच्या अनेक गावांमधून लोक आपल्या वस्तू विकायला आणि गरजेच्या वस्तू खरेदी करायला येत होते.बाजाराच्या दिवशीच तर सगळ्यांच्या गाठी भेटी होत.





बाजारात शिरल्याबरोबर लोक एकमेकांना भेटत होते.

“रामराम!”

“कसं काय?”

“घरी सगळं ठीक आहे?”

येमीनं आईला आंबे लावून ठेवायला मदत केली. बाजारात फळं विकणाऱ्या आणखी काही बाया होत्या. त्यापैकी एकीनं म्हटलं, “येमी आता मोठी झाली. तुला किती मदत करते आहे ती!”

“हो ना,” आई म्हणाली. “आज ती कोकूला सांभाळणार आहे.”

“एकटी मी!” येमीनं भर घातली.

“एकटी तू? हो हो!” त्या बाईला आश्चर्य वाटलं. मान डोलावून ती हसली कारण तिलाही पक्कं माहित होतं.





जेव्हा आंबे नीट रचून झाले तेव्हा येमीनं आईला विचारलं, “मी आणि कोकू बाजारात हिंडून येऊ का?” आई म्हणाली, “जा पण फार वेळ जाऊ नका. लवकर या.”



थोडंसं पुढे गेल्यावर कोकू कुरकुरायला लागला.

"याला नक्की भूक लागली असेल," येमीनं विचार केला. त्याला थोडा वेळ खाली ठेवून ती भुईमुगाच्या शेंगा विकत घ्यायला गेली....



...आणि कोकू तिथून चालत चालत निघाला.





“अरे बापरे!” येमी किंचाळली. जेव्हा तिनं वळून बघितलं तोपर्यंत कोकू तिथून गेलेला होता.

येमीनं शेंगा आणल्या आणि खिशात घातल्या.

.....आणि त्याला शोधण्यासाठी ती धावत सुटली.



“कुठे गेला असेल तो?” येमी स्वतःशीच पुटपुटली.
त्याला शोधताना तिला काळजी वाटू लागली.
“कोकूला भूक लागली असेल.”


पण तो भुकेला नव्हता.



“त्याला तहान लागली असेल.”

पण तो तहानलेला नव्हता.





“कोकू घाबरला असेल.”

पण तो घाबरलेला नव्हता.





“त्याला ऊन लागलं असेल.”

पण त्याला ऊन लागलंच नव्हतं.





“तो थकून गेला असेल.”

पण तो थकलेला नव्हता.



सगळीकडे त्याला शोधून झाल्यावर शेवटी येमी थांबली आणि जोरात ओरडली - “कोकू हरवला आहे!”





पण तो हरवलेला नव्हता.

येमी जिथे उभी होती त्याच्या समोरच्या बाजूला कोकू झोपेतून उठत होता. चटया विकणाऱ्या काकांनी विचारलं, “हाच का गं तुझा कोकू?”



“हो तर!” कोकूला प्रेमाने उचलून येमी जोरात म्हणाली.



चटईवाल्याला येमी म्हणाली, “काका, याला सांभाळल्याबद्दल तुमचे खूप खूप आभार.”

चटईवाले काका हसून म्हणाले, “अरे! मी एकट्यानी थोडंच सांभाळलं?” कोकू जिथून आला होता तिकडे त्यांनी बोट दाखवलं.

येमीनं पुन्हा एकदा त्यांचे आभार मानले आणि ती त्यांनी दाखवलेल्या दिशेनं चालू लागली.



तिनं म्हटलं, “धन्यवाद.”
आणखी एकदा....



...आणखी एकदा.



आणखी एकदा....

आणखी एकदा.



येमी कोकूला म्हणाली, “आपण केव्हाचे फिरतो आहोत कोकू!” “आई काळजी करत असेल.”



पण आईला काळजी नव्हती. तिला पक्कं माहित होतं. “हे माझ्या आईनं मला सांगितलं आहे आणि तिच्या आईनं तिला सांगितलं होतं. आज मी तुला सांगत आहे. आज तू एकटी नव्हतीस येमी. आपण एकटेच आपल्या मुलांना सांभाळत नाही. एका मुलाला सांभाळायचं तर सगळं गाव पाठीशी उभं राहतं.”



आपल्या देशातल्याप्रमाणेच आफ्रिकेतल्या गावांमधे लोक मिळून मिसळून राहतात. सगळं गाव म्हणजे जणू काही एक कुटुंबच असतं. त्याच एकोप्याची ही गोष्ट आहे.

आठवड्यात एकदा किंवा दोनदा बाजार भरतो. आपल्या गावातच नाही तर शहरातल्या वेगवेगळ्या भागातही बाजार भरतो. त्याच प्रकारे आफ्रिकेच्या गावांमधे बाजार भरतो. तिथे खरेदी करणारे आणि विकणारे तेच आसपासचे लोक असतात. अनेक प्रकारच्या वस्तू तिथे मिळतात. आणि त्या खरेदी करून लोक आपल्या खाणं पिणं, कपडे यांची बेगमी करतात.

बाजाराचा दिवस म्हणजे एकमेकांना भेटण्याचा आणि हालहवाल समजून घेण्याचा दिवस असतो. नातेवाईक, मित्रमंडळी आणि ओळखीच्या लोकांच्या भेटीगाठी होण्याचा दिवस.

आफ्रिकेत एक म्हण आहे, “एका मुलाला वाढवायचं तर सारं गाव लागतं.” कोकूची ही गोष्ट हेच सांगते आहे!

